**ई-गव्हर्नन्स अंतर्गत पवित्र प्रणालीसाठी व शालार्थ प्रणालीसाठी Net Magic व्दारे cloud service शुल्कास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५२१/प्र.क्र.०२/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांकः- ९ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-**

१) माहिती व तंत्रज्ञान विभागाचे, क्र.मातंसं-०६०/३/२०१७/२, दिनांक १९ मे, २०१८ चे परिपत्रक.
२) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१४.०३.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्र.ईगव्ह-१५१९/प्र.क्र.९/संगणक, दि.१२ जून, २०२०.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशिका/२०२१/netmagic/ई गव्ह/३८९६, दि. २३ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ नुसार शासनाच्या सर्व विभागांच्या ई-गव्हर्नन्स प्रकल्पांसाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने निश्चित केलेल्या "Cloud Service Provider" कडूनच आवश्यक servers उपलब्ध करुन घ्यावायाचे बंधनकारक करण्यात आले आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ अन्वये Netmagic या Cloud Service Provider ची निवड करण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ नुसार सदर खर्चास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.४ अन्वये आयुक्त, शिक्षण, पुणे यांनी सादर केलेल्या Invoice नुसार M/s. Netmagic IT Services Pvt.Ltd. यांना रु.४६,४५,२७०/- इतकी रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

**२.** पवित्र प्रणालीसाठी व शालार्थ प्रणालीसाठी दि.२४.०८.२०२० ते ३०.०६.२०२१ या कालावधीत दिलेल्या Cloud services शुल्काची एकत्रित रु.४६,४५,२७०/- (सेहचाळीस लाख पंचेचाळीस हजार दोनशे सत्तर) इतकी रक्कम अदा करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

**३.** सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षा खालील सन २०२१-२२ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक, (लेखा ) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४७७/व्यय-५, दिनांक २८०५.२०२१ अन्वये वितरीत केलेल्या निधीच्या मर्यादेत राहून निर्गमित करण्यात येत आहे..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१०१६४७३०४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.02.10 16:50:34 +05'30'

**( स्वा.म.नानल)**
**उपसचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.